मतदार यादीमधील नोंदणीमध्ये दुरुस्ती, नाव वगळणी, तसेच नविन नोंदणी ईत्यादी प्रक्रीया गावातील नागरिकांपर्यत सुलभतेने पोहचाव्या याकरीता विशेष ग्रामसभेचे आयोजन करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन परीपत्रक क्रमांकः** संकिर्ण २०२१/प्र.क्र.९८/पं.रा.-२
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ
मंत्रालय, मुंबई-४००००१
तारीख: २५ ऑक्टोंबर, २०२१.

**संदर्भ -:** प्रधान सचिव तथा मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे अ.शा.प.क्र .संकिर्ण/२०२१ प्र.क्र ,३३/२१/५७६.दिनांक ११ ऑक्टोंबर , २०२१रोजीचे पत्र .

**शासन परिपत्रक -:**

भारत निवडणूक आयोगाकडून दरवर्षी विशेष संक्षिप्त पुनरिक्षण कार्यक्रमांतर्गत अस्तित्वात असलेल्या मतदार यादीची पडताळणी व दुरस्ती करुन ती त्रुटी विरहीत करण्याचा व दि.१ जानेवारी या अर्हता दिनांकानुसार नविन मतदार नाव नोंदणी करुन मतदार यादी सुधारित करण्याचा कार्यक्रम राबविण्यात येतो. चालू वर्षीच्या पुनरिक्षण कार्यक्रमामध्ये १ जानेवारी, २०२२ रोजी १८ वर्षे पुर्ण करणारे नवमतदार यांची नोंदणी करून मतदार यादी सुधारीत करण्याचा कार्यक्रम आयोजित करण्यात येत आहे. यापुर्वी विशेष संक्षिप्त पुनरिक्षण कार्यक्रमांतर्गत गावातील नागरिकांनी मतदार यादीतील त्यांची नोंदणी तपासणी व नविन मतदारांनी नाव नोंदणी करण्यासाठी प्रत्येक गावामध्ये मतदार यादीच्या चावडी वाचनाचा उपक्रम घेऊन जनजागृती करण्यात येत होती. तथापि, आता हा उपक्रम गावातील प्रत्येक नागरिकांपर्यत सुलभतेने पोहचावा याकरीता प्रत्येक गावामध्ये विशेष ग्रामसभेचे आयोजन करण्याची विनंती प्रधान सचिव तथा मुख्य निवडणूक अधिकारी यांनी अप्पर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग यांना दि. ११ ऑक्टोंबर, २०२१ च्या पत्रान्वये केलेली आहे.

२. त्यानुसार राज्यातील सर्व ग्रामपंचायतींनी असे निदेश देण्यात येत आहेत की, त्यांनी दि. १६ नोव्हेंबर, २०२१ रोजी संपुर्ण राज्यातील ग्रामपंचायतीमध्ये मतदार यादीच्या विशेष संक्षिप्त पुनरिक्षण कार्यक्रमासाठी एका विशेष ग्रामसभेचे आयोजन करण्यात यावे.

३. सदर विशेष ग्रामसभेमध्ये मतदार यादीच्या विशेष संक्षिप्त पुनरिक्षण कार्यक्रमाच्या अनुषंगाने खालील उपक्रम करण्यात यावेत.

१. ग्रामपंचायतीची अस्तित्वात असलेली मतदार यादी ग्रामसभेमध्ये गावातील सर्व नागरिकांना पहाण्यासाठी/ तपासण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात यावी. तसेच या यादीचे ग्रामसभेमध्ये वाचन करण्यात यावे.

२. गावातील सर्व नागरिकांना मतदार यादीमधील नोंदी तपासून घेण्यासाठी सांगण्यात यावे.

३. मतदार यादीमधील नोंदीबाबत नागरीकांना हरकती असल्यास/त्यांना नोंदीमध्ये दुरुस्ती करावयाची असल्यास किवा नाव नसलेल्या पात्र नागरिकांना त्यांचे नाव नव्याने नोंदवावयाचे असल्यास त्यांना त्यांना विहीत अर्ज फॉर्म तेथेच ग्रामसभेत उपलब्ध करुन दयावेत. याकरीता ग्रामपंचायत कार्यालयाने आधीच संबधित मतदार नोंदणी अधिकारी कार्यालय/ तहसिल कार्यालयाकडून आवश्यक अर्जाच्या फॉर्मचे नमुने उपलब्ध करुन घ्यावेत. या अंतर्गत मयत मतदारांची वगळणी, कायम स्थलांतरीत मतदारांची वगळणी, लग्न होऊन बाहेर गेलेल्या महिलांच्या नावाची वगळणी तसेच लग्न होऊन गावात आलेल्या महिल्यांच्या नावाची नोंदणी, PwD मतदार चिन्हांकित करणे व ज्यांचे दिनांक ०१/०१/२०२२ रोजी १८ वर्षे पुर्ण होत आहे त्यांची नवीन मतदार म्हणून नोंदणी या कामावर भर देण्यात यावा.

४. ग्रामसेवक किंवा संबधित गावातील मतदान केंद्रस्तरीय अधिकारी (BLO) यांनी नागरिकांना अर्ज भरण्याबाबत मार्गदर्शन करावे. या कामासाठी गाव कामगार व तलाठी यांनी सहकार्य करावे.

५. नागरिकांकडून प्राप्त होणाऱ्या हरकती /आक्षेप/दुरुस्ती वा नाव नोंदणींच्या अर्जाचे यांचे संकलन करुन ग्रामपंचायत कार्यालयाने संबधित मतदार नोंदणी अधिकारी कार्यालयाकडे पाठवावे.

६. शक्य असल्यास, सदर ग्रामसभेमध्ये नागरिकांना ऑनलाईन नाव नोंदणी nvsp portal/ voter helpline App वरुन कशी करता येते याबाबत मतदान केंद्रस्तरीय अधिकारी (BLO) यांनी माहिती दयावी.

७. नागरिकांना मतदार नोंदणी अधिकारी कार्यालयाकडून मतदार यादीबाबतचे कामकाज कसे चालते याची महिती मतदान केंद्रस्तरीय अधिकारी (BLO) यांनी माहिती दयावी.

८. नागरीकांना संबधित मतदार नोंदणी अधिकारी, संबधित मतदान केंद्रस्तरीय अधिकारी (BLO) यांचे नाव, संपर्क क्रमांक उपलब्ध करुन दयावेत.

९. संबधित मतदान केंद्रस्तरीय अधिकारी (BLO) यांनी ग्रामसभेमध्ये गावातील नागरिकांनी दिलेल्या हरकती /आक्षेप/दुरुस्ती वा नाव नोंदणींच्या अर्जाची स्थितीबाबत त्या नागरिकांना कोठून व कशी माहिती मिळेल याबाबत मार्गदर्शन करावे.

४. वरीलप्रमाणे राज्यातील सर्व ग्रामपंचायतींनी दि. १६ नोव्हेंबर, २०२१ या रोजी संपुर्ण राज्यातील सर्व ग्रामपंचायतींमध्ये मतदार यादीच्या विशेष संक्षिप्त पुनरिक्षण कार्यक्रमासाठी एका विशेष ग्रामसभेचे

आयोजन करुन त्याबाबतचा अहवाल जिल्हाधिकारी तथा जिल्हा निवडणूक अधिकारी यांच्याकडे पाठवावा. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी या विशेष ग्रामसभा या प्रत्येक ग्रामपंचायतीमध्ये होतील याची दक्षता घ्यावी व तशा सुचना त्यांनी त्यांच्यास्तरावरुनही ग्रामपंचायतींना द्याव्यात.

५. या संदर्भात व्यापक योग्य ती प्रसिध्दी गावपातळीवर होईल याचीही दक्षता संबंधीत पंचायत समित्यांनी घ्यावी. याबाबतच्या प्रसिध्दीसाठीचा कंटेंट जिल्हा निवडणूक अधिकारी/मतदार नोंदणी अधिकारी/ सहायक मतदार नोंदणी अधिकारी यांचेकडून उपलब्ध करून घ्यावा. याची प्रसिध्दी प्रत्यक्ष ग्रामसभेच्या १० दिवस अगोदर करावी, जेणेकरून जास्तीत जास्त ग्रामस्थांचा सहभाग वाढेल. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२२१२५४०६३८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANGESH MOHITE

Digitally signed by MANGESH MOHITE
DN: cn=MANGESH MOHITE, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou=GOVT OF MAHARASHTRA, email=SOPR2.RDD-MH@NIC.IN, c=IN
Date: 2021.10.25 11:49:59 +05'30'

**मंगेश वसंत मोहिते (भाप्रसे)**
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग यांचे स्विय सहाय्यक.
२. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांचे स्विय सहाय्यक
३. जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, सर्व जिल्हे.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद (सर्व).
५. उप मुख्य कार्यकारी अधिकारी, पंचायत, सर्व जिल्हा परिषदा.
६. गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सर्व
७. ग्रामसेवक किंवा ग्राम विस्तार अधिकारी, सर्व ग्रामपंचायती.